महाराष्ट्र राज्य मानवी हक्क
आयोगाच्या कार्यालयाची माहिती
**शासकीय** व निमशासकीय कार्यालयावर
लावण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन परिपत्रक क्र.एचआरसी-१३२००४/संकीर्ण-६२/पोल-१४
मंत्रालय, मुंबई दिनांक:-२८ सप्टेंबर, २००५.

**परिपत्रक**

मानवी हक्क संरक्षण अधिनियम १९९३ मधील कलम २१ च्या तरतूदीनुसार महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाची स्थापना दि.१५ जानेवारी, २००० पासून करण्यात आली. बहुतेक मानवी हक्कांची गणणा भारतीय संविधानाच्या भाग-तीन मधील मूलभूत हक्कांखाली करण्यात आलेली आहे. मानवी हक्क हे सार्वजनिक, अविभाज्य, स्वाभाविक व मूलभूत स्वरुपाचे आहेत. त्यांची उन्नती करणे, संरक्षण देणे, अंमलबजावणी करणे याबाबतचे कार्य आयोगाकडून हाताळण्यात येते. सदर हक्कांचे उल्लंघन झाल्यास अथवा त्याबाबतची तक्रार प्राप्त झाल्यास, आयोग सबंधीत प्रकरणाची चौकशी करुन उचित कार्यवाही करण्यास्तव संबंधीत प्राधिकरणास अथवा शासनास शिफारस करते.

राज्यातील जनतेस त्यांच्या मानवी हक्काच्या उल्लघनासंदर्भातील तक्रार सादर करणे अथवा गा-हाणी ऐकूण घेणे सोईचे व्हावे याकरिता सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागास सूचित करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रीय प्राधिकरणास (शासकीय, निमशासकीय, स्थानिक स्वराज्य संस्था इत्यादी) खालील प्रमाणे महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाच्या कार्यालयाची माहिती असणारा फलक त्यांच्या कार्यालयाच्या दर्शनी भागात लावण्याबाबत सूचित करण्यात यावे.

**"मानवी हक्कांचे उल्लंघन बाबत तक्रार नोंदवण्याचे ठिकाण"**

राज्य मानवी हक्क आयोग,
प्रशासकीय अधिकारी महाविद्यालय,
९, हजारीमल सोमाणी मार्ग,
छत्रपती शिवाजी टर्मिनस समोर,
मुंबई-४००००१
**दूरध्वनी क्रमांक:-** (०२२) २२०९२८५७
(०२२) २२०७६४०८

D:\amol m\2005\Sep\Pole-14LETTER CR-62-GR

(०२२) २२०३४२३३
(०२२) २२०७३४३४
फॅक्स क्रमांक (०२२) २२०९१८०४

सदरहू कार्यालयांनी, माहिती फलक त्यांचे दर्शनी भागात लावण्याची कार्यवाही १५ दिवसांच्या आत पूर्ण करुन, संबंधीत मंत्रालयीन प्रशासकीय विभागास त्याप्रमाणे कळवावे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशावरुन व नांवाने.**

( सं.द.माने )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग